**वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालयाच्या अधिपत्याखालील संस्थांकरीता All-in-One संगणक आणि प्रिंटर खरेदीसाठी वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

**शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.५८/प्रशा-२**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २१ मार्च, २०२५

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. मातसं २०११/प्र.क्र.१२५/३९, दिनांक २३.०९.२०११
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दि. १७.०४.२०१५.
३) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समितीच्या दिनांक २७.०३.२०२३ व दिनांक २४.०५.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.५८/प्रशा-२, दिनांक ११.०७.२०२३.
५) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.५८/प्रशा-२, दिनांक २७.१०.२०२३
६) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्रमांक: संवैशिवस/यंसाख-म/संगणक,प्रिंटर/GeM/२०२५/२२४८, दिनांक १७.०३.२०२५

<u>प्रस्तावना :-</u>

वैद्यकीय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय, दंत, आयुर्वेद, होमिओपॅथी महाविद्यालये व रुग्णालयांमध्ये NIC ची NextGen e-Hospital प्रणाली राबाविण्यास मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या उच्चाधिकार समितीने दिलेल्या मान्यतेनुसार संदर्भाधीन दिनांक ११.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. त्यानुसार, NIC ची NextGen e-Hospital प्रणाली प्रभावीपणे कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक संगणक व आणि प्रिंटिंग सुविधा उपलब्ध करणे आवश्यक आहे. या पार्श्वभूमीवर, ६५० नग All-in-One संगणक आणि ६५० नग प्रिंटर खरेदीसाठी GeM पोर्टलवर निविदा प्रसिद्ध करण्यात आली होती. निविदा प्रक्रियेनुसार प्राप्त न्यूनतम किंमतीच्या (L1) देकारास वित्तीय मान्यता देण्याबाबत आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय यांनी दिनांक १७.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये शासनाकडे विनंती केली होती. त्यानुसार, विभागाच्या अधिपत्याखालील ५२ संस्थांमध्ये ही NextGen e-Hospital प्रणाली कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक All-in-One संगणक आणि प्रिंटर खरेदीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वैद्यकीय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील ५२ शासकीय वैद्यकीय, दंत, आयुर्वेद व होमिओपॅथी महाविद्यालये व रुग्णालये येथे NIC मार्फत विकसित NextGen e-Hospital प्रणाली कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक ६५० नग All-in-One संगणक आणि ६५० नग प्रिंटर M/s. ACE BRAIN SYSTEMS AND SOFTWARE PRIVATE LIMITED या सेवापुरवठादारकडून उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता येणा-या रु. ७,२८,६५,०००/- (सात कोटी अठ्ठावीस लाख पासष्ट हजार रुपये) (सर्व करांसह) इतक्या खर्चास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबींसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा:

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा-विषमचिकित्सा राज्य योजनेंतर्गत योजना
(००) (०९) - वैद्यकीय महाविद्यालयचे व संलग्न रुग्णालयात आरोग्य सेवा
३० - इतर कंत्राटी सेवा (२२१० डी ९६२)

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -२, अ.क्र. २७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202503211827209613 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT,
2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.03.21 18:47:22 +05'30'

**(म.गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
३. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) ½, महाराष्ट्र, मुंबई.
५. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय, मुंबई.

६. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
७. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
८. एन.आय.सी., मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. सर्व अधिष्ठाता / अधिक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालये.
१२. M/s. ACE BRAIN SYSTEMS AND SOFTWARE PRIVATE LIMITED.
१३. निवडनस्ती (प्रशा-२)